**भायखळा जिल्हा कारागृह येथील थकीत विद्युत देयकाची रक्कम रु. ५५,७९,८३०/- इतक्या रकमेच्या प्रदानास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- जेएलएम-०६१७/प्र.क्र.६८/तुरुंग-२**

दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा</u> : अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे यांचे पत्र क्र.इप्रवि/भाजिका/थविबी/२०१७/कक्ष-६(२)/५०००/पुणे, दि. २२.०६.२०१७

**शासन निर्णय :**

भायखळा जिल्हा कारागृह व मुंबई जिल्हा महिला कारागृह या दोन स्वतंत्र आस्थापना एकत्र असून, सध्या या कारागृहाकरीता होणाऱ्या विद्युत पुरवठयाकरीता खालीलप्रमाणे एकूण सहा (०६) विद्युत मीटर कार्यान्वित आहेत. सदर विद्युत मीटरच्या देयकांची एकूण थकबाकी रक्कम रु. ५५,७९,८३०/- इतकी आहे. सदरची देयके कोषागार कार्यालयास सादर केली असता, बिलांमध्ये विलंब आकाराचा समावेश असल्यामुळे सदर देयकास आक्षेप घेतलेला असल्याने, सदरची रक्कम अदा करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, पुणे यांनी केली आहे. त्यास अनुसरुन, या शासन निर्णयान्वये भायखळा जिल्हा कारागृहातील विद्युत देयकांच्या रु. ५५,७९,८३०/- इतक्या रकमेच्या प्रदानास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | ग्राहक क्रमांक | विद्युत मीटरचे ठिकाण | एप्रिल २०१७ पर्यंत थकीत देयकाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २०२-०२७-५४७*६ | महिला विभाग | ७,३४,९९०/- |
| २ | २०२-०११-०१३* | मुख्यद्वार | २४,०५,५००/- |
| ३ | ९०१-४२०-७००*७ | पुरुष विभाग | १५,०४,७२०/- |
| ४ | ९०१-४२०-६७५*१ | सहयाद्री इमारत | १,१४,६३०/- |
| ५ | ९०१-४२०-१११* | प्रगती इमारत | ३,३६,५८०/- |
| ६ | ९०१-४२०-९००*४ | बैठी चाळ | ४,८४,४१०/- |
| | | | **एकूण :- ५५,७९,८३०/-** |

२. या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्रमांक बी-५, मुख्य लेखाशिर्ष - २०५६ तुरुंग (०१)(१०१), (००)(०२) जिल्हा तुरुंग (दत्तमत) (२०५६००४४)(अनिवार्य)(०६) दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५, नियम १४७ मधील टिप-३ मध्ये सूट देऊन वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग- पहिला, उपविभाग-एक, अ.क्र.६ नियम क्र.४० नुसार सदर प्रलंबित देयके प्रदान करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१६/२०१७/व्यय-८, दि.२०.०१.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.५०/२०१८/विनियम, दि. ०२.०२.२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळ उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०१८०८०६११२९३६५७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Siddharth Vidyadhar Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f, serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2018.08.06 11:34:29 +05'30'

**( सि. वि. धांडोरे)**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई
४. महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. कार्यासन अधिकारी, (व्यय-८ / विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
८. निवड नस्ती (तुरुंग-२)

***********